प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) अंतर्गत प्राप्त झालेला केंद्र शासनाच्या हिश्याचा (अनुसूचित जाती उपयोजना) निधी सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: प्रआयो-२०२०/प्र.क्र.८८/योजना-१०**
**बांधकाम भवन**, २५ **मर्झबान रोड**,
**फोर्ट**, **मुंबई** - ४०० ००१.
**तारीख: २५ मार्च**, २०२२

**वाचा :-**

१) उप संचालक, (ग्रामीण गृहनिर्माण), ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे क्र. J-१२०२५/०१/२०१९-RH (A/C)-१/A-Maharashtra, दि.२४.०८.२०२० रोजीचे आदेश.

२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण गृहनिर्माण यांचे पत्र क्र. राव्यक-ग्रागृ/लेखा /(प्रआयो)/अ.जा./२०२०/२१२, दि.०३.०९.२०२०.संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण गृहनिर्माण यांचे पत्र क्र. राव्यकृ-ग्रागृ/लेखा(प्रआयो)/ अ.जा./२०२०/२९, दि.१९.०६.२०२०.

३) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. बिजीटी-२०२०/प्र.क्र.३०/ अर्थसंकल्प (विघयो), दि.०४.०२.२०२१.

४) शासन निर्णय ग्रामविकास विभाग क्र. प्रआयो-२०२०/प्र.क्र.८८/ योजना-१०, दि.२५.०२.२०२१.

५) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण गृहनिर्माण यांचे पत्र क्र. राव्यक-ग्रागृ/लेखा (प्रआयो) /अनु.जाती/२०२२/१९४८, दि.२४.०१.२०२२.

६) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. बिजीटी-२०२०/प्र.क्र.२५/ अर्थसंकल्प (विघयो), दि.२४.०३.२०२२

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना ग्रामीण करिता अनुसूचित जाती उपयोजना घटकांतर्गत केंद्र शासनाने संदर्भाधिन क्रमांक १ च्या दिनांक २४.०८.२०२० च्या पत्रान्व्ये रुपये ६६,३२,१०,०००/- एवढा निधी वितरीत केला आहे. त्यापैकी उपरोक्त संदर्भाधिन क्र.४ दिनांक २५.०२.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये रुपये ६६,००,००,०००/- इतकी रक्कम वितरीत करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. उर्वरित केंद्र शासनाच्या हिश्शाचा निधी रू. ३२,१०,०००/- (अक्षरी रूपये बत्तीस लाख दहा हजार फक्त) एवढा निधी खर्च करण्यास व अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०२१-२२ या वर्षातील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा व मागणी क्र. एन-३ २५०५ ग्रामीण रोजगार, ६० इतर कार्यक्रम, ७८९ अनुसूचित जातींसाठी विशेषघटक योजना (०१) (०४) प्रधानमंत्री आवास योजना

(ग्रामीण) (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) ३१ सहाय्यक अनुदाने वेतनेत्तर (२५०५ ए १०२) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती कार्यासन योजना-२ यांना सादर करण्यात यावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा देयक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयात नोंद झालेल्या रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

४. प्रस्तुत निधीबाबत उपसंचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण-गृहनिर्माण हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून (संकेतांक क्रमांक १२०१००५१८३) तसेच संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण -गृहनिर्माण हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर निधीची देयके ठाणे कोषागार अंतर्गत उपकोषागार कार्यालय, कोकण भवन, बेलापूर येथे पारित करण्यात यावीत.

५. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आलेले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.८१/ अर्थसंकल्प, दि.२४ मार्च,२०२२ तसेच, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३६५/व्यय-१४ , दि. २४ मार्च, २०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२५१६१९१९०२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN VASANT SHINDE

Digitally signed by ARUN VASANT SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=213d983c0c3b73519fa14c37396dd0b3cf8f28e16bc2fb6620a5c4fdac6e7284, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=672D36CC7468AA812E66DBB4704FFEB120DD58831284824F4FBEC2A6F6602199, cn=ARUN VASANT SHINDE
Date: 2022.03.25 17:08:29 +05'30'

(अरुण व.शिंदे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई (पाच जादा प्रतींसह)

२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.

३) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
४) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर,नवी मुंबई.
५) सामाजिक न्याय विभाग (वि.घ.योजना), मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
६) वित्त विभाग (व्यय-१५) व (अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) कार्यासन अधिकारी, वित्त-७, वित्त-१, योजना-१, योजना-२, योजना-५ व योजना-७, ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट,मुंबई.
८) निवड नस्ती,योजना-१०, ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.